वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामुळे झालेल्या मनुष्यहानीसाठी अर्थसहाय्य देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी-२०१२/प्र.क्र.३३७/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०००३२

तारीख: १६ जानेवारी, २०१५

**पहा :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. डब्ल्यूएलपी-१०.०८/ प्र.क्र.२७० /फ-१, दिनांक ०२/०७/२०१०.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-२०१२/प्र.क्र.३३७ /फ-१, दिनांक ३०/०३/२०१३.

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-२०१२/प्र.क्र.३३७ /फ-१, दिनांक २९/०५/२०१३.

**प्रस्तावना :-**

वाघ, बिबटया, अस्वल, गवा (बायसन), रानडुक्कर, लांडगा, तरस, कोल्हा, हत्ती, मगर व रानकुत्रे (ढोल) यांना वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ अंतर्गत संरक्षण देण्यात आलेले आहे. वनक्षेत्राच्या अधिवासात आढळणाऱ्या वन्यप्राण्यांकडून होणाऱ्या हल्ल्यात मनुष्य हानी झाल्यास दिनांक ०२/०७/२०१०, दिनांक ३०/०३/२०१३ व दिनांक २९/०५/२०१३ च्या शासन निर्णयामधील तरतुदींनुसार अर्थसहाय्याची रक्कम संबंधितांना अदा करण्यात येते. सदर शासन निर्णयान्वये मनुष्यहानी प्रकरणी देण्यात येणारी अर्थसहाय्याची रक्कम कमी असल्यामुळे त्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच वनक्षेत्राच्या अधिवासात आढळणाऱ्या हिंस्र प्राण्यांकडून होणाऱ्या हल्ल्यात मनुष्य किरकोळ जखमी झाल्यास दिनांक ०२/०७/२०१० च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार अर्थसहाय्याची रक्कम संबंधितांना अदा करण्यात येते. सदर शासन निर्णयान्वये मनुष्य किरकोळ जखमी प्रकरणी देण्यात येणारी अर्थसहाय्याची रक्कम कमी असल्यामुळे त्यातही वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) वाघ, बिबटया, अस्वल, गवा (बायसन), रानडुक्कर, लांडगा, तरस, कोल्हा, हत्ती, मगर व रानकुत्रे (ढोल) यांच्या हल्ल्यामुळे व्यक्ती मृत झाल्यास दिनांक ३०/०३/२०१३ रोजीच्या शासन निर्णयानुसार देय असलेल्या अर्थसहाय्याच्या रकमेत खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे. सदर अर्थसहाय्य दिनांक ०२/०७/२०१० व दिनांक ३०/०३/२०१३ रोजीच्या शासन निर्णयामधील दिलेल्या अटींच्या अधीन राहून देण्यात यावे. व्यक्ती कायम अपंग झाल्यास किंवा गंभीररीत्या

जखमी झाल्यास देय अर्थसहाय्य दि.३०/०३/२०१३ रोजीच्या शासन निर्णयानुसारच राहील, त्यात कोणताही बदल नाही.

| व्यक्ती मृत झाल्यास देय अर्थसहाय्याची रक्कम | | |
|---|---|---|
| अ.क्र. | तपशील | देय अर्थसहाय्याची रक्कम |
| १ | व्यक्ती मृत झाल्यास | रु. ८,००,०००/- (रु. आठ लाख फक्त) |

२) वाघ, बिबटया, अस्वल, गवा (बायसन), रानडुक्कर, लांडगा, तरस, कोल्हा, हत्ती, मगर व रानकुत्रे (ढोल) यांच्या हल्ल्यामुळे व्यक्ती किरकोळ जखमी झाल्यास दिनांक ०२/०७/२०१० रोजीच्या शासन निर्णयानुसार देय अर्थसहाय्याच्या रकमेत खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे. सदर अर्थसहाय्य दिनांक ०२/०७/२०१० रोजीच्या शासन निर्णयामधील दिलेल्या अटींच्या अधीन राहून देण्यात यावे.

| व्यक्ती किरकोळ जखमी झाल्यास देय अर्थसहाय्याची रक्कम | | |
|---|---|---|
| अ.क्र. | तपशील | देय अर्थसहाय्याची रक्कम |
| १ | व्यक्ती किरकोळ जखमी झाल्यास | औषधोपचारांसाठी येणारा खर्च देण्यात यावा. मात्र खाजगी रुग्णालयात औषधोपचार करणे अगत्याचे असल्यास त्याची मर्यादा रू. १५,००० (रु. पंधरा हजार फक्त) प्रती व्यक्ती अशी राहील. शक्यतो औषधोपचार शासकीय / जिल्हा परिषद रुग्णालयात करावा. |

३) वन्य प्राणी हल्ल्यामुळे मृत झालेल्या व्यक्तीच्या वारसांना अनुदान / अर्थसहाय्य देण्याबाबतचे निकष दिनांक २९/०५/२०१३ च्या शासन निर्णयान्वये ठरवण्यात आलेले आहेत. त्यानुसार या रकमेपैकी रुपये १ लाख अर्थसहाय्य म्हणून देण्यात येईल आणि उर्वरीत रक्कम दिनांक २९/०५/२०१३ च्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे देय असलेल्या व्यक्तींच्या नावे त्यांच्या राष्ट्रीयकृत बँकेत असलेल्या दरमहा व्याज देणाऱ्या संयुक्त खात्यामध्ये ठेव रक्कम (फिक्स डिपॉझीट) जमा करण्यात यावी.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३६८/२०१४/व्यय-१०, दिनांक २०/१२/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

उपरोक्त तरतुदी शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११७१२५३४५०६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.01.17 13:02:43 +05'30'

**( डॉ. यु. एम. फारूकी )**

**सह सचिव (वने)**

**महसूल व वन विभाग**

प्रत, माहिती व उचित कार्यवाहीसाठी :-

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री (वने), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महासंचालक, माहिती व प्रसिध्दी महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११.प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ, नागपूर.
१४.प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, म.रा. पुणे
१५.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नागपूर / पश्चिम मुंबई / नाशिक.
१६.सर्व विभागीय आयुक्त
१७.सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक)
१८. सर्व मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव)

१९.सर्व महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ
२०.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
२१.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
२२.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
२३.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर
२४.मुख्य वनसंरक्षक तथा संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरिवली
२५.वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
२६.सर्व पोलीस आयुक्त
२७.सर्व जिल्हाधिकारी
२८. सर्व वनसंरक्षक (वन्यजीव)
२९.सर्व उपवनसंरक्षक (प्रादेशिक)
३०.सर्व उपवनसंरक्षक (वन्यजीव)
३१.सर्व विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ
३२.विभागीय वन अधिकारी, सांगली / उस्मानाबाद / बीड / चिपळूण / हिंगोली.
३३.उप विभागीय वन अधिकारी, भोर / संगमनेर / मालेगांव
३४.सर्व पोलीस अधिक्षक.
३५.सर्व जिल्हा कृषी अधिकारी.
३६.महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपूर
३७.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३८. वित्त विभाग (व्यय-१० कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
३९.कृषी, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४०.प्रसिध्दी व माहिती अधिकारी (वने), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४१.वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४२.निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.